कंत्राटी व बंधपत्रीत वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या मानधनात वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मवैअ-२०२०/प्र.क्र.१५२/सेवा-३**
गो.ते. रुग्णालय संकुल, १० वा मजला
नविन मंत्रालय, मुंबई-०१
दिनांक: २९ मे, २०२०.

**वाचा :-**

१) **शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः संकीर्ण-२०१९/प्र.क्र.२२/कोषा प्रशा ४, दि. २९ जानेवारी, २०२०.**
२) **शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग: मवैअ-१०५४/प्र.क्र.२४१/सेवा-३,दि. १३ जुन,२०१९.**
३) **शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग: मवैअ-२०२०/प्र.क्र.१५२/सेवा-३, दि.२०एप्रिल,२०२०.**

**प्रस्तावना :-**

शासन परिपत्रक वित्त विभाग दि. २९.०१.२०२० अन्वये कंत्राटी व बंधपत्रीत सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांना दि. ०१.०४.२०२० पासून "१०-कंत्राटी सेवा" या उद्दिष्ट शीर्षातुन परिश्रमीक/मानधन/ठोक रक्कम प्रदान करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. सद्यस्थितीत कंत्राटी वैद्यकीय अधिकाऱ्यांना दि. १३ जुन, २०१९ च्या शासन निर्णयान्वये व बंधपत्रीत वैद्यकीय अधिकाऱ्यांना दि. २० एप्रिल, २०२० अन्वये मानधन निश्चित करण्यात आलेले आहे. सदर मानधनात वाढ करुन सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत कार्यरत कंत्राटी व बंधपत्रीत वैद्यकीय अधिकारी गट-अ यांचे मानधनात वाढ करुन सुधारीत दरमहा मानधन खालीलप्रमाणे निश्चीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कंत्राटी व बंधपत्रीत वैद्यकीय अधिकारी | सुधारीत मासिक मानधन |
|---|---|---|
| १. | आदिवासी व दुर्गम भागात काम करणारे एम.बी.बी.एस. अर्हताधारक | रु. ८०,०००/- |
| २. | आदिवासी व दुर्गम भागात काम करणारे विशेषज्ञ अर्हताधारक | रु. ९०,०००/- |
| ३. | इतर भागात काम करणारे एम.बी.बी.एस. अर्हताधारक | रु. ७५,०००/- |
| ४. | इतर भागात काम करणारे विशेषज्ञ अर्हताधारक | रु. ८५,०००/- |

दि. ०१ जुन, २०२० पासून वरील सुधारीत दराप्रमाणे कंत्राटी व बंधपत्रीत वैद्यकीय अधिकारी गट-अ यांना **"१० - कंत्राटी सेवा"** या उद्दीष्ट शीर्षातून मानधन अदा करण्यात यावे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ११/२०२०/कोषाप्रशा४, दि.२९.०५.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००५२९१४५३०६३११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2020.05.29 17:09:57 +05'30'

**(व.मुं.भरोसे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२. संचालक (१), आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. संचालक (२), आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशा.), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, प्रभारी मंडळे, महाराष्ट्र राज्य (सर्व)
६. सहायक संचालक, (लेखा व लेखा परीक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
८. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
९. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट-१, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
११. वित्त विभाग (अर्थसंकल्प-९/व्यय-१३) मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (सेवा-३)